**प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१६ व रब्बी हंगाम २०१६-१७ करीता पिक विमा हप्ता अनुदानाची रु.४७.५७ कोटी इतकी रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो -२०१७/प्र.क्र.२७/११ अे,**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**तारीख: २९ मार्च, २०१७**

वाचा -

१) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१६/प्र.क्र.९७/११ अे, दि. ५.७.२०१६ व दि.१६.७.२०१६
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पूरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थसंकल्प-३, दि.०४.०१.२०१७
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६
४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.संकिर्ण-२०१७/प्र.क्र.७/१७/२-अे, दि.१०.१.२०१७
५) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१६/प्र.क्र.२८१/११ अे, दि.१८.१.२०१७
६) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१६/प्र.क्र.२४४/११ अे, दि.२५.१.२०१७
७) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.प्रपिवियो/सां.८/पुमा१६-१७/८२/२०१७, दि.२.२.२०१७
८) शासन ज्ञापन कृषि व पदुम विभाग क्र.आसुअं-२०१७/प्र.क्र.५१/१७/(२-अे), दि.२७.३.२०१७
९) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.प्रपियो/सां.८/पुमा२०१६-१७/२०१/२०१७, दि.२७.३.२०१७

प्रस्तावना -

खरीप हंगाम २०१६ तसेच रब्बी हंगाम २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यात आलेल्या प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या विमा हप्ता अनुदानातील राज्य शासनाच्या हिश्श्याच्या खरीप हंगाम २०१६ करिताच्या एकूण रु.१६,८८,४४,७८,१७०/- पैकी रु.१६,५३,८०,०००००/- इतकी रक्कम योजना राबविण्याकरिता नियुक्त केलेल्या विमा कंपन्यांना अदा करण्यासाठी भारतीय कृषि विमा कंपनीकडे हस्तातंरीत करण्याकरिता यापूर्वीच कृषि आयुक्तालयाकडे अदा करण्यात आली आहे. खरीप हंगाम २०१६ करिता विमा हप्ता अनुदानातील उर्वरित रु. ३४,६४,७८,१७०/- तसेच रब्बी हंगाम २०१६-१७ करिता विमा हप्ता अनुदानापोटी द्यावयाची अग्रीम रक्कम रु.१२,९२,२१,८३०/- अशी एकूण रु.४७.५७ कोटी इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्याकरिता कृषि आयुक्तालयाने त्यांच्या दि.२.२.२०१७ व दि.२७.३.२०१७ च्या पत्राने कळविले आहे. आता उपरोक्त दि.२७.३.२०१७ च्या शासन ज्ञापनान्वये रु.४७.५७ कोटी इतकी रक्कम आठमाही सुधारित अंदाजानुसार उपलब्ध करुन देण्यात आली आहे. या परिस्थितीत कृषि आयुक्तालयाने विनंती केल्यानुसार खरीप हंगाम २०१६ तसेच रब्बी हंगाम २०१६-१७ मधील प्रधानमंत्री पिक विमा योजना राबविण्याकरिता नियुक्त केलेल्या विमा कंपन्यांना अदा करण्यासाठी वरीलप्रमाणे देय असणारी रु.४७.५७ कोटी (रुपये सत्तेचाळीस कोटी सत्तावन लाख फक्त) इतकी रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

खरीप हंगाम २०१६ तसेच रब्बी हंगाम २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यात आलेल्या प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या विमा हप्ता अनुदानातील (२४०१ A६६४) राज्य शासनाच्या हिश्श्याची रु.४७.५७ (रुपये सत्तेचाळीस कोटी सत्तावन लाख फक्त) इतकी रक्कम विमा कंपन्यांना अदा करण्यासाठी भारतीय कृषि विमा कंपनीला अदा करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ करिता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा:

**"मागणी क्रमांक डी - ३,**
**२४०१- पीक संवर्धन,**
**११०, पीक विमा**
**(००) (०८) प्रधानमंत्री पीक विमा योजनेअंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय (राज्य हिस्सा)**
**(२४०१ A६६४),**
**(योजनेत्तर)"**

३. सदरचा निधी रु.४७.५७ (रुपये सत्तेचाळीस कोटी सत्तावन लाख फक्त) वित्त विभागाच्या उपरोक्त अनुक्रमांक ३ येथील परिपत्रकामधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये वितरीत करण्यात येत आहे.

४. या प्रयोजनासाठी सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१२११३५२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.03.30 12:13:49 +05'30'

**(श.बा.पावसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
८. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई ३२
९. कक्ष अधिकारी (२ अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
११. सहसचिव/उप सचिव (११-अे/२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, मुंबई.
१३. निवड नस्ती (कार्यासन ११अे)